सह संचालक आरोग्य सेवा (हिवताप,हत्तीरोग व
जलजन्यरोग) पुणे या कार्यालयातील नुतनीकरण
व फर्निचरच्या कामाच्या अंदाजपत्रक व
आराखडयांना प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रशामा २०१७/ प्रक्र-११४/आरोग्य ३(अ)**
गो.ते.संकुल इमारत, १० वा मजला,
एल.टी.मार्ग, मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
दिनांक:- १२ जुलै,२०१७.

**संदर्भ:-**

सह संचालक,आरोग्य सेवा,रुग्णालये (राज्यस्तर) मुंबई यांचे पत्र क्रमांक : संआसे /कक्ष-३/टे-६/ सहसं हिहवजलजन्यरोग फर्निचर/ २०५४-५५/१७,दिनांक ४.३.२०१७.

**शासन निर्णय:-**

सह संचालक,आरोग्य सेवा,रुग्णालये (राज्यस्तर) मुंबई यांच्या संदर्भाधीन प्रस्तावास अनुसरुन सह संचालक आरोग्य सेवा (हिवताप,हत्तीरोग व जलजन्यरोग) पुणे या कार्यालयातील नुतनीकरण व फर्निचरच्या अनुक्रमे रु.१९,०३,७७०/- व रु.७०,४६,१९८/- इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास खालील अटी व शर्तींच्या अधिन राहून या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

अटी व शर्ती-:

१) कामासाठी निविदा मागविण्याआधी सदर कामास सार्वजनिक बांधकाम विभागातील सक्षम अधिकाऱ्यांची तांत्रिक मंजुरी घेणे आवश्यक राहील.
२) क्षेत्रिय जागेच्या परिस्थितीनुसार व आरोग्य संस्थांच्या आवश्यकतेनुसार प्रस्तावित कामाची किंमत वाढणे शक्य असल्यामुळे त्यासाठी आवश्यक प्रस्ताव सार्वजनिक बांधकाम विभागाच्या त्या-त्या भागाच्या क्षेत्रिय अधिकाऱ्यांकडून करुन घ्यावेत.
३) सदरचे अंदाजपत्रक हे ढोबळ नमुना अंदाजपत्रक असल्याने, या कामांच्या सविस्तर अंदाजपत्रकांना तांत्रिकदृष्ट्या मान्यता ही सार्वजनिक बांधकाम खात्याच्या त्या त्या क्षेत्राच्या सक्षम अधिकाऱ्यांकडून करण्यात येईल. अशी तांत्रिक मान्यता करीत असताना आरोग्य खात्याच्या त्या-त्या आरोग्य सेवा मंडळाच्या उप संचालकांच्या सहमतीने तरतुदी अंतिम करण्यात याव्यात.
४) अंदाजपत्रकात आकस्मिक खर्च,सेंटेज चार्जेस व सेवाकरासाठी तरतूद योग्य करण्यात आली आहे.
५) नुतनीकरण व फर्निचरच्या कामाच्या निविदा स्वतंत्रपणे मागविण्यात याव्यात.
६) सदर कामाचा खर्च सार्वजनिक आरोग्य विभागाने त्यांच्याकडील उपलब्ध निधीतून भागवावा.

सह संचालक आरोग्य सेवा (हिवताप,हत्तीरोग व जलजन्यरोग) पुणे या कार्यालयातील नुतनीकरण व फर्निचरच्या अनुक्रमे रु.१९,०३,७७०/- व रु.७०,४६,१९८/- इतक्या रकमेचा खर्च मागणी मुख्यलेखाशिर्ष " ४२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०१- नागरी आरोग्य सेवा (वैद्यकीय सहाय्य) ११०-रुग्णालये व

दवाखाने, (१) (अ) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-इमारती, (००)(०१)मोठी बांधकामे (४२१० ००१४)-५३ मोठी बांधकामे " याखाली सन २०१७-१८ खाली मंजूर करण्यात आलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

हे आदेश शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक- विअप्र २०१३/प्र.क्र.३०/विनियम, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्ट, भाग पहिला, उपविभाग-पाच मधील अनुक्रमांक-१, परिच्छेद क्रमांक- १३४ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्रमांक २०१७०७१११७०३२२५५१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ROSHANI DINESH KADAM PATIL

Digitally signed by ROSHANI DINESH KADAM PATIL
DN: cn=ROSHANI DINESH KADAM PATIL, o, ou, email=roshani.patil@nic.in, c=US
Date: 2017.07.12 11:54:13 +05'30'

(रो.दि.कदम-पाटील)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महालेखापाल,महाराष्ट्र(लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा)२/१-,मुंबई.
२. आयुक्त,आरोग्य सेवा तथा संचालक,राष्ट्रीय आरोग्य अभियान,मुंबई
३. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
४. संनियंत्रक तथा मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई
५. सह संचालक, आरोग्य सेवा रुग्णालये (राज्यस्तर), मुंबई
६. सह संचालक आरोग्य सेवा (हिवताप,हत्तीरोग व जलजन्यरोग) पुणे
७. जिल्हा कोषागार अधिकारी,पुणे
८. कार्यकारी अभियंता,सार्वजनिक बांधकाम विभाग,पुणे
९. कार्यासन अधिकारी,सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई.
१०. अवर सचिव,(आ-३) सार्वजनिक आरोग्य विभाग,मंत्रालय,मुंबई
११. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. निवडनस्ती .(३-आरोग्य)